**खाजगी संस्थांमार्फत चालविण्यात येणाऱ्या "अ" श्रेणीतील १२३ विना अनुदान तत्वावरील अपंगांच्या विशेष निवासी/अनिवासी शाळा/ कर्मशाळांना देण्यात आलेल्या वाढीव विद्यार्थी संख्येस अनुदान देणे व त्यानुषंगाने वाढीव पदमंजूरी देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**दिव्यांग कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्र. इडीडी-२०१८/प्र.क्र.१३८/दि.क.१**
३१, ३२, ३५ ए, मित्तल टॉवर, ए-विंग, तिसरा मजला
बॅरिस्टर रजनी पटेल मार्ग, नरीमन पॉईंट, मुंबई-४०० ०२१.
दिनांक :- ०८ जून, २०२४.

**वाचा:-** १) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग शासन निर्णय क्र.इडीडी-२००३/प्र.क्र.३४०/ भाग-३/सुधार-२, दि.१८ ऑगस्ट, २००४.

२) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग शासन निर्णय क्र.इडीडी-२०१२/प्र.क्र.६७/ अ.क.१, दि.०८.०४.२०१५.

३) मा.उच्चस्तर सचिव समितीच्या दि.१६.१०.२०१८ रोजीच्या सातव्या बैठकीचे इतिवृत्त.

४) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग शासन निर्णय क्र.इडीडी-२०१८/प्र.क्र.१३८ /अ.क.१, दि.६ नोव्हेंबर, २०१८.

५) मा. उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल रिट याचिका क्र. ६८१/२०१९ प्रकरणी मा. उच्च न्यायालयाचे दिनांक २०.०१.२०२० रोजीचे आदेश.

६) मा. उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल अवमान याचिका क्र. ११/२०२१ प्रकरणी मा. न्यायालयाचे दि. ७ मे, २०२४ रोजीचे आदेश.

७) मा.मंत्रिमंडळाच्या दिनांक ०६ जून, २०२४ रोजीच्या बैठकीचे इतीवृत्त.

**प्रस्तावना :-**

शासन मान्य खाजगी संस्थांमार्फत चालविण्यात येणाऱ्या "अ" श्रेणीतील १२३ विनाअनुदान तत्वावरील दिव्यांगांच्या विशेष निवासी/अनिवासी शाळा/कर्मशाळांना अनुदान तत्वावर मान्यता देण्याबाबतचा शासन निर्णय दि.०८.०४.२०१५ रोजी मा.मंत्रीमंडळाच्या मान्यतेने निर्गमित करण्यात आला. तद्नंतर उच्चस्तरीय सचिव समितीच्या दि.१६.१०.२०१८ रोजी झालेल्या बैठकीत दिलेल्या मान्यतेने शासन निर्णय दि.०६.११.२०१८ अन्वये उक्त शाळा/कर्मशाळांपैकी १२१ शाळांना काही अटींच्या पुर्ततेच्या अधिन राहून पदमंजूरी देण्यात आली.

शासन निर्णय दि.०८.०४.२०१५ मधील काही शाळा/कर्मशाळांना मा.उच्चस्तर सचिव समितीच्या बैठकीपूर्वी व काही शाळा/कार्यशाळांना बैठकीनंतर तत्कालीन मा.मंत्री (सा.न्या.) यांच्या मान्यतेने "पदमंजूरीकरीता वित्त विभाग व उच्चस्तर सचिव समितीची मान्यता मिळण्याचे अधिन राहून वाढीव विद्यार्थी संख्या मान्य" या अटीच्या अधिन राहून वाढीव विद्यार्थी संख्येस मान्यता प्राप्त झाली. त्यानुषंगाने वाढीव विद्यार्थी संख्येबाबत शासन शुध्दीपत्रके निर्गमित करण्यात आली.

या सर्व प्रकरणी वाढीव विद्यार्थी संख्येनुसार वाढीव पदे मिळणार असल्याने सदर पदांचा वेतन खर्च तसेच विद्यार्थ्यांना परिपोषण अनुदान व इतर सुविधांबाबत शासनावर आर्थिक भार येणार असल्याने शुध्दीपत्रके निर्गमित करण्यापूर्वी वित्त विभागाची मान्यता घेणे आवश्यक होते. दि.०८.०४.२०१५ रोजीच्या शासन निर्णयानुसार ज्या १२३ शाळांना अनुदान तत्वावर मान्यता देण्यात आली व त्यांतील १२१ शाळा/कार्यशाळांना मा.मुख्य सचिव महोदयांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तर सचिव समितीने दि.१६.१०.२०१८ रोजीच्या बैठकीनुसार एकूण २४६४ पदांना मंजूरी दिली. त्यानुसार दि. ६.११.२०१८ रोजी शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे. परंतु, शुद्धीपत्रकान्वये वाढीव विद्यार्थी संख्येनुसार वाढीव पदे देण्यात आलेली नाहीत, अशा प्रकरणांची विभाग स्तरावर छाननी केली असता, एकूण १६ प्रकरणी वाढीव विद्यार्थी संख्या देण्याबाबत शासन शुध्दीपत्रक निर्गमित झाली परंतु त्यानुसार वाढीव पदे देण्यात आली नसल्याचे आढळून आले.

उपरोक्त १६ प्रकरणी तत्कालीन मा. मंत्री (सा. न्या.) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात आलेल्या शासन शुद्धीपत्रकांन्वये देण्यात आलेल्या वाढीव विद्यार्थी संख्येनुसार वाढीव पदे न मिळाल्यामुळे काही उपक्रमांनी मा. उच्च न्यायालयाच्या खंडपीठांमध्ये रिट याचिका दाखल केलेल्या आहेत. सदर याचिकांचे अनुषंगाने मा. उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे १) अवमान याचिका क्रमांक ११ / २०२१, सौ.सुमतीबाई गुणाले शिक्षण प्रसारक मंडळ, धानोरा (खु.), ता.अंबाजोगाई, जि.बीड व इतर, २) **अवमान याचिका क्र.१८८/२०२३**-जगजाहीर शिक्षण प्रसारक मंडळ, नांदेड, ३) **अवमान याचिका क्र. ६४/२०२४** बाबासाहेब परांजपे प्रतिष्ठाण, अंबेजोगाई ता. अंबेजोगाई, जि. बीड व इतर तसेच मा. उच्च न्यायालय, खंडपीठ मुंबई येथे ४) **अवमान याचिका क्र.३९८/२०२२** अजिंक्य फाऊंडेशन, सांगली, या संस्थांनी दाखल केलेल्या आहेत.

सदर १२३ शाळा/कार्यशाळांना विद्यार्थी संख्येनुषंगाने अनुदान तत्वावर मान्यता देण्याबाबतचा शासन निर्णय दि.०८.०४.२०१५ हा मा.मंत्रिमंडळाच्या मान्यतेने निर्गमित करण्यात आला असल्याने सदर शासन निर्णयामध्ये वाढीव विद्यार्थी संख्येचे शुध्दीपत्रक निर्गमित करताना मा.मंत्रीमंडळाची मान्यता घेणे आवश्यक होते. सबब, सदर १६ शाळा/ कर्मशाळांना वाढीव विद्यार्थी संख्येवर वाढीव पदे देण्याबाबत निर्गमित करण्यात आलेल्या शासन शुद्धीपत्रकांना कार्योत्तर मान्यता देणेबाबतचा प्रस्ताव मा. मंत्रिमंडळाचे दिनांक ०६ जून, २०२४ रोजीचे बैठकीत मान्यतेस्तव सादर करण्यात आला असता त्यावर मा. मंत्रिमंडळाने दिलेल्या आदेशांचे अनुषंगाने कार्यवाही करणेची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय:**

मा. मंत्रिमंडळाच्या मान्यतेने निर्गमित करण्यात आलेल्या शासन निर्णय दि. ८ एप्रिल, २०१५ अन्वये शासन मान्य खाजगी संस्थांमार्फत चालविण्यात येणाऱ्या "अ" श्रेणीतील १२३ विनाअनुदान तत्वावरील दिव्यांगांच्या विशेष निवासी/अनिवासी शाळा/कर्मशाळांना अनुदान तत्वावर मान्यता देण्यात आली. त्याबाबतचा शासन निर्णय दि.०८.०४.२०१५ रोजी निर्गमित करण्यात आला. तद्नंतर उच्चस्तरीय सचिव समितीने दि.१६.१०.२०१८ रोजीचे बैठकीत दिलेल्या मान्यतेस अनुसरुन शासन निर्णय दि.०६.११.२०१८ अन्वये सदर शाळा/कर्मशाळांपैकी १२१ शाळांना काही अटींच्या पुर्ततेच्या अधिन राहून विद्यार्थी संख्येनुसार अनुज्ञेय होणाऱ्या २४६४ पदांना मंजूरी देण्यात आली. तद्नंतर शासन निर्णय दि.०८.०४.२०१५ मधील १६ शाळा/कर्मशाळांना तत्कालीन मा.मंत्री (सा.न्या.) यांच्या मान्यतेने मा.मंत्रिमंडळाची मान्यता न घेता वाढीव विद्यार्थी संख्येस मान्यता प्रदान करण्यात आली असून त्याबाबतची शासन शुध्दीपत्रके निर्गमित करण्यात आली. सदर शासन शुद्धीपत्रकांना कार्योत्तर मान्यता देणेबाबतच्या प्रस्तावावर मा. मंत्रिमंडळाने दि. ६ जून, २०२४ रोजी घेतलेल्या निर्णयाचे अनुषंगाने शासन निर्णय दि.०८.०४.२०१५ मधील खालील तक्त्यात नमूद १६ शाळा/कर्मशाळांना तत्कालीन मा.मंत्री (सा.न्या.) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात आलेल्या शासन शुद्धीपत्रकांना खाली नमूद अटी व शर्तीचे अधिन राहून कार्योत्तर मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | जिल्हा | शाळा/ कार्यशाळेचे नाव | दि.८. ०४. २०१५ नूसार मान्य विद्यार्थी संख्या | वाढीव विद्यार्थी संख्या शासन शुध्दी पत्रक दिनांक | वाढीव विद्यार्थी संख्या निवासी/ अनिवासी |
|---|---|---|---|---|---|
| १ | हिंगोली | श्री.जगजाहीर शिक्षण प्रसारक मंडळ, नांदेड संचलित निवासी अस्थिव्यंग विद्यालय, डोंगरकडा ता.कळमनुरी, जि.हिंगोली | ४० निवासी | शा.शु.क्र.इडीडी-२०१८/प्र.क्र.३३९ / अ.क.-१, दि.३१.७.१८ | ३५ निवासी |
| २ | सोलापूर | इंडियन सोशल रिसर्च डेव्हलपमेंट ऑर्गनायझेशन, सोलापूर संचलित प्रगती मुकबधीर निवासी विद्यालय, सोलापूर | ४० निवासी | शा.शु.क्र.इडीडी-२०१८/प्र.क्र.४६३ / अ.क.-१ दि.२९.८.१८ | १० निवासी |
| ३ | अ.नगर | आधार शिक्षण व ग्रामिण विकास मंडळ, नांदुरी दुमाला, ता.संगमनेर संचलित साईसेवा निवासी मतिमंद मुला-मुलींची शाळा, शिर्डी, ता.राहता, जि.अहमदनगर | २५ निवासी | शा.शु.क्र.इडीडी-२०१८/प्र.क्र.४१५ / अ.क.-१, दि.२९.८.१८ | ३५ निवासी |
| ४ | बुलढाणा | श्री. आनंदस्वामी शिक्षण प्रसारक संस्था, देऊळगांव मही, ता.देऊळगांव राजा, बुलढाणा संचलित जीजामाता निवासी मुकबधीर विद्यालय, साखरखेडा, ता.सिंदखेड राजा, बुलढाणा | ४० निवासी | शा.शु.क्र.इडीडी-२०१८/प्र.क्र.४२२ / अ.क.-१, दि.३१.८. १८ | ३५ निवासी |
| ५ | बीड | सौ.सुमतीबाई गुणाले शिक्षण प्रसारक मंडळ, धानोरा (खु.), ता.अंबाजोगाई, जि.बीड संचलित सेवा मतिमंद विद्यार्थ्यांचे निवासी शेतकी प्रशिक्षण केंद्र, धानोरा, ता.अंबाजोगाई, जि.बीड | ४० निवासी | शा.शु.क्र.इडीडी-२०१८/प्र.क्र.४१४ / अ.क.-१, दि.५.९. १८ | २० निवासी |
| ६ | सांगली | अजिंक्य फाऊंडेशन संचलित इन्स्टिटय़ूट फॉर मेंटली हॅन्डीकॅप्ड, कुपवाड, ता.मिरज, जि.सांगली | २० अनिवासी | शा.शु.क्र.इडीडी-२०१८/प्र.क्र.८७/ अ.क.-१, दि.६.०९.१८ | ३० अनिवासी |
| ७ | बीड | बाबासाहेब परांजपे प्रतिष्ठान संचलित कर्तव्य मतिमंद मुलींचे निवासी विद्यालय | ४५ निवासी | शा.शु.क्र.इडीडी-२०१८/प्र.क्र.६३/ अ.क.-१, दि.१४.१०.२१ | १५ निवासी |
| ८ | गडचिरोली | शांतिवन अपंग निराधार व आदिवासी विकास संस्था, | ४० निवासी | शा.शु.क्र. ईडीडी- | १० निवासी |

| अ. क्र. | जिल्हा | शाळा/ कार्यशाळेचे नाव | दि.८. ०४. २०१५ नूसार मान्य विद्यार्थी संख्या | वाढीव विद्यार्थी संख्या शासन शुध्दी पत्रक दिनांक | वाढीव विद्यार्थी संख्या निवासी/ अनिवासी |
|---|---|---|---|---|---|
| | | देसाईगंज (वडसा), जि. गडचिरोली संचलित शांतीवन अपंगाची निवासी कार्यशाळा, देसाईगंज (वडसा), गडचिरोली | | २०१२/प्र.क्र.६७/ अ.क.-१ दि.१३.४.१६ | |
| ९ | जळगांव | राष्ट्रीय एकात्मता शिक्षण प्रसारक मंडळ संचलित निवासी मतिमंद विद्यालय, सावदा, ता. रावेर,जि.जळगांव | ४० निवासी | शा.शु.क्र.इडीडी-२०१८/प्र.क्र.४३४ / अ.क.-१, दि.२९.८.१८ | ४० निवासी |
| १० | उस्मानाबाद | शिवशारदा शिक्षण प्रसारक बहु.मंडळ वाशी संचलित निवासी मतिमंद विद्यालय वाशी, जि. उस्मानाबाद | ५० निवासी | शा.शु.क्र.इडीडी-२०१८/प्र.क्र.८७/ अ.क.-१, दि.६.०९.१८ | ४० निवासी |
| ११ | नागपूर | महेश विद्या प्रसारक शिक्षक संस्था, नागपूर संचलित संस्कार मतिमंद मुलांची शाळा, नागपूर | ४० अनिवासी | शा.शु.क्र.इडीडी-२०१८/प्र.क्र.८७/ अ.क.-१, दि.६.०९.१८ | १० अनिवासी |
| १२ | गडचिरोली | स्वामी विवेकानंद ज्ञान प्रसारक मंडळ, बोरी, ता,अहेरी, संचलित स्वामी विवेकानंद मतिमंद निवासी विद्यालय, चामोर्शी, जि. गडचिरोली. | ४० निवासी | शा.शु.क्र.इडीडी-२०१८/प्र.क्र.५५७ / अ.क.-१, दि.२१.९.१८ | ३५ निवासी |
| १३ | सातारा | सहयाद्री शिक्षण संस्था, पाचवड, ता.वाई, जि. सातारा संचलित आपुलकी मतिमंद मुलांची शाळा, कुडाळ, ता. जावळी, जि. सातारा. | २० निवासी २० अनिवासी | शा.शु.क्र.इडीडी-२०१८/प्र.क्र.५८० / अ.क.-१, दि.३.११.१८ | १० निवासी |
| १४ | औरंगाबाद | विद्यासागर शिक्षण प्रसारक मंडळ, नांदेड संचलित इंदिरा निवासी मुकबधीर विद्यालय, नारेगांव, औरंगाबाद. | ४० निवासी | शा.शु.क्र.इडीडी-२०१८/प्र.क्र.४८० / अ.क.-१, दि.२७.११.१८ | ३५ निवासी |
| १५ | कोल्हापूर | कागल तालुका कला क्रिडा शैक्षणिक व सांस्कृतिक मंडळ, कागल संचलित स्व्. गणपतराव गाताडे निवासी व अनिवासी मतिमंद विद्यालय, ता. कागल, जि. कोल्हापूर. | २४ निवासी ८ अनिवासी | शा.शु.क्र. एमआयएस-२०१८/प्र.क्र.५१८ / अ.क.-१, दि.१७.६.१९ | १४ निवासी १४ अनिवासी |

| अ. क्र. | जिल्हा | शाळा/ कार्यशाळेचे नाव | दि.८. ०४. २०१५ नूसार मान्य विद्यार्थी संख्या | वाढीव विद्यार्थी संख्या शासन शुध्दी पत्रक दिनांक | वाढीव विद्यार्थी संख्या निवासी/ अनिवासी |
|---|---|---|---|---|---|
| १६ | गडचिरोली | भिमराव झाडे शिक्षण संस्था संचलित मुकबधीर निवासी विद्यालय, पेरमिली, ता. अहेरी, जि, गडचिरोली. | ४० निवासी | शा.शु.क्र.इडीडी-२०१८/प्र.क्र.५७७ / अ.क.-१, दि.२६.१०.२१ | १० निवासी |

**अटी व शर्ती:**

खालील नमूद मुद्यांचे अनुषंगाने आयुक्त, दिव्यांग कल्याण, पुणे यांचे मार्फत तपासणी करुन त्याबाबतचा तपासणी अहवाल आयुक्त, दिव्यांग कल्याण यांचे स्वयंस्पष्ट अभिप्रायांसह शासनास सादर करण्यात यावा.

**१.** उपरोक्त १६ शाळा/कर्मशाळांची विद्यार्थ्यांची आधार संलग्न- बायोमेट्रीक उपस्थिती प्रणालीवरील उपस्थिती, प्रवेशित विद्यार्थ्यांसाठी आवश्यक भौतिक सोई-सुविधा, सरल प्रणालीवरील विद्यार्थी आधार वैधता व दिव्यांगत्व प्रमाणपत्र/युडीआयडी या बाबींची तपासणी करुन याबाबतचा अहवाल, आधार संलग्नीकरणाची सद्यस्थिती तपासणी करुन वाढीव विद्यार्थी संख्येवर शासन निर्णय दि. १८.०८.२००४ नुसार एकूण अनुज्ञेय होणाऱ्या पदांचा एकत्रीत प्रस्ताव आयुक्त, दिव्यांग कल्याण, पुणे यांनी शासनास सादर करावा.

**२.** आयुक्त, दिव्यांग कल्याण, पुणे यांच्या प्रस्तावानुसार उक्त उपक्रमांमधील अनुज्ञेय पदांना उच्चस्तरीय सचिव समितीच्या मान्यतेने पदमान्यता देणेबाबत कार्यवाही करण्यात यावी.

**३.** वित्त विभागाची / मा.मंत्रीमंडळाची मान्यता न घेता निर्गमित केलेल्या शासन शुध्दीपत्रकांच्या अनुषंगाने जबाबदार असणाऱ्या सर्व संबंधीत अधिकारी/कर्मचारी यांचा खुलासा घेऊन त्यानुषंगाने नियमानुसार पुढील कार्यवाही करण्यात यावी.

२. सदर शासन निर्णय मा. मंत्रिमंडळाच्या दिनांक ०६ जून, २०२४ रोजी आयोजित बैठकीमध्ये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२४०६१०१४४११६४६३५ असा आहे. तसेच सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

VISHNUDAS PUNDLIKRAO GHODKE

Digitally signed by VISHNUDAS PUNDLIKRAO GHODKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPT., 2.5.4.20=514c2e5ad6ac71c69b99a86a5fe5189556b7a95d5896bbb81496f403bb58ac3e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9AB69D6945F8950A9525831F8AE9726BE295D17576E78D19FA8F6CB952BB04A0, cn=VISHNUDAS PUNDLIKRAO GHODKE
Date: 2024.06.10 15:05:58 +05'30'

( वि. पुं. घोडके )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
३) मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
४) मा. सभापती, विधान परिषद यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई,

५) मा. अध्यक्ष, विधान सभा यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई,
६) मा. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
७) मा. विरोधी पक्ष नेता (विधानसभा / विधान परिषद), महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
८) मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
९) आयुक्त, दिव्यांग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१०) सर्व संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
११) प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण,
१२) सर्व संबंधित जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद,
१३) सहाय्यक आयुक्त, मुंबई शहर / उपनगर,
१४) निवड नस्ती.